खर्चास मंजुरी देण्याबाबत काढलेल्या आदेशांच्या प्रती, महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई आणि नागपूर यांना न पाठविण्याबाबत.

---

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
मंत्रालय, मुंबई-400 032.
शासन परिपत्रक क्र.संकीर्ण 1098/प्र.क्र.67/98/विनियम,
दिनांक 10 ऑगस्ट, 1999.

**पहा :-** 1) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.मुंविनि-1085/सीआर-434/सर्वसाधारण-5, दिनांक 2 जुलै, 1985.

2) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.मुंविनि-1088/(19)/कोषागारे-6, दिनांक 27 जानेवारी, 1988.

**परिपत्रक :-** मुंबई वित्तीय नियम, 1959 मधील नियम 152 अनुसार खर्चास मंजुरी देण्याबाबतच्या आदेशाच्या प्रती महालेखापालांना पाठविणे आवश्यक आहे. या विभागाच्या संदर्भाधिन दिनांक 2 जुलै, 1985 व दिनांक 27 जानेवारी, 1988 च्या परिपत्रकान्वये अन्य बाबींच्या आदेशांच्या प्रती महालेखापालांच्या कार्यालयांना पाठवू नयेत, अशा सूचना देण्यात आलेल्या होत्या. तथापि, शासकीय कार्यालये अजूनही खाली नमूद केलेल्या आदेशांच्या प्रती महालेखापालांच्या कार्यालयांकडे पाठवितात, असे त्या कार्यालयाने निदर्शनास आणलेले आहे. शासन आदेशातील विषयाशी ज्या कार्यालयाचा संबंध नसतो त्या कार्यालयास सदर आदेशाच्या प्रती विनाकारण पाठविण्यात येत असल्यामुळे त्या कार्यालयांच्या कामात अकारण वाढ होते. त्या कार्यालयास आदेशाची प्रत आपणाकडे कशासाठी पाठविली याचा बोध होत नाही. तसेच जादा प्रती हे सुध्दा खर्चिक होते. हे लक्षात घेऊन सर्व कार्यालयांना पुन्हा एकदा कळविण्यात येत आहे की, खालील विषयावरील आदेशाच्या प्रती महालेखापालांच्या मुंबई व नागपूर येथील कार्यालयांना पाठवू नयेत.

1) सण अग्रिम, प्रवास भत्ता अग्रिम, सायकल अग्रिम, वेतन अग्रिम यांचे मंजूरीचे आदेश.
2) "क" व "ड" श्रेणीतील रोजंदारी वरील अस्थायी कर्मचारी यांच्या नेमणुकीचे आदेश.
3) विशेष समुदेशी/अभियोक्ता यांच्या नेमणुकीचे व त्यांना मानधन देण्याबाबतचे आदेश.
4) वेगवेगळया श्रेणीतील कर्मचा-यांच्या बदलीसंबंधीचे आदेश.
5) राज्य शासनाच्या विविध विभागांतील अधिका-यांच्या स्वाक्षरीचे नमुने.
6) पाटबंधारे व सार्वजनिक बांधकाम विभागातील तात्पुरत्या पदांना पुढे चालू ठेवण्यास दिलेल्या मंजूरीचे आदेश.
7) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने घेतलेल्या वेगवेगळ्या परीक्षांच्या निकालाच्या अधिसूचना.
8) जिल्हा परिषदांचे वार्षिक लेखा अहवाल.

2. सदर परिपत्रक महालेखापाल (ले. व अ.)-1, मुंबई यांच्या अनौ.संदर्भ क्र.टीएम/सीएच-वन/एमआयएससी/129, दिनांक 16.4.99 च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अं. ज. खानविलकर,
कार्यासन अधिकारी,
वित्त विभाग.

(कृ.मा.प.

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-1, महाराष्ट्र, मुंबई-400 020,

महालेखापाल (लेखा परीक्षा)-1, महाराष्ट्र, मुंबई-400 020,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-2, महाराष्ट्र, नागपूर,

महालेखापाल (लेखा परीक्षा)-2, महाराष्ट्र, नागपूर,

अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे/मुंबई,

निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,

मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,

राज्यपालांचे सचिव,

मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव,

उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,

सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,

* प्रबंधक, उच्च न्यायालय, (मूळ शाखा), मुंबई,

* प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई,

* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई,

* प्रमुख न्यायाधीश, कुटुंब न्यायालय, नागपूर/मुंबई, वांद्रे, मुंबई-400 051,

उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती.

उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,

सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

सर्व उप कोषागार अधिकारी,

मंत्रालयाच्या सर्व प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख,

मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभाग,

सर्व विभागीय आयुक्त,

सर्व जिल्हाधिकारी,

सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी,

विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली-110 001,

संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-8, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खारकसिंग मार्ग, नवी दिल्ली-110 001.

निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग.

---

* पत्राने.

---

एच-651 (12500+15-8-99)अ.